रेशीम शेती उद्योग विकास
जिल्हास्तरीय योजने अंतर्गत नवीन बाबींचा समावेश करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय, क्र.रेशीम-१११०/प्र.क्र.८७/रेशीम कक्ष
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: **८ सप्टेंबर, २०१०**

वाचा:- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक:रेशीम-११०६/प्र.क्र.७३/रेशीम कक्ष, दिनांक २१ ऑगस्ट २००७.
२) संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांचे पत्र -
१) क्र. रेशीम/कार्या-९/जिवायो-बाबवार खर्च/१०/३४१४, दि.९ एप्रिल, २०१०,
२) क्र.रे/कार्या-८/जिवायो/बाबवार खर्च/०९-१०/५८९०, दि.१७ जुलै, २०१०.

**प्रस्तावना:-** रेशीम संचालनालयाचा विस्तार व विकास होण्याच्यादृष्टिने जिल्हास्तरीय योजने अंतर्गत (डीपीडीसी) विकासात्मक कामाच्या खर्चासाठी दिनांक २१ ऑगस्ट २००७ च्या शासन निर्णयान्वये सुधारित खर्चाची मानके निश्चित करण्यात आली आहेत.

रेशीम संचालनायांतर्गत रेशीम उद्योगाच्या विकासासाठी मुलभूत सुविधा (फार्मस्, रिलिंग, अंडीपुंज निर्मिती केंद्र, ट्विस्टींग व कापड निर्मिती) निर्माण करण्यात आलेल्या आहेत. सदर मूलभूत सुविधांचे बळकटीकरण व व्यवस्थापन खर्च हा राज्यस्तरीय योजने अंतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात येत होता. त्यासाठी सदरचा खर्च जिल्हास्तरीय योजने अंतर्गत करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाचे विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

**राज्यातील रेशीम उद्योगाचा विस्तार व विकासासाठी खालीलप्रमाणे मुलभूत सुविधा निर्माण करण्यात आल्या आहेत:-**

| अ.क्र. | बाबवार योजनांच्या विभागाची नांवे | तुती विभाग | टसर विभाग |
|---|---|---|---|
| १ | रिलिंग (रेशीम धागा निर्मिती) केंद्र (DCTC Reeling Centre) | १३ | ६ |
| २ | रेशीम कोष खरेदी केंद्र, ड्रायर व साठवणुकीकरिता गोडाऊन | २३ | ८ |
| ३ | ट्विस्टींग (धाग्याला पिळ देणे) व कापड निर्मिती केंद्र | २ | १ |
| ४ | रेशीम पथदर्शक तथा प्रशिक्षण केंद्र (PETC FARM Centre) | १० | १५ |
| ५ | अंडीपुंज निर्मिती केंद्र (Grainage Centre) | १ | ४ |
| ६ | शितगृहे (Cold Storage) | १ | १ |

२. वरीलप्रमाणे निर्माण करण्यात आलेल्या मुलभूत सुविधांचे व्यवस्थापन व बळकटीकरणाचा खर्च सन २०१०-११ पासून जिल्हास्तरीय योजने अंतर्गत (डीपीडीसी) करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर मुलभूत सुविधांवर खालीलप्रमाणे खर्चाचा समावेश असेल:-

१) **रेशीम पथदर्शक तथा प्रशिक्षण केंद्र (PETC FARM Centre):** तुती व टसर विभागातील फार्मवर देखभाल खर्च, मजुरी, वीजबील, पाणीबील, नर्सरी रोप वाटीका मजुरी खर्च, किटक संगोपनाचा मजुरी खर्च, किरकोळ साहित्य खरेदी खर्च.

२) **रिलिंग विभाग:** तुती व टसर विभागातील रिलिंग केंद्रावर रेशीम धागा निर्मितीकरिता मजुरी, संयंत्राचे सुटे भाग खरेदी व दुरुस्ती, रिलिंग साहित्य खरेदी, वीज देयक, रिलिंग केंद्राचे जागा भाडे व पाणी खर्च व किरकोळ खर्चाचा समावेश होतो. तुती व टसर विभागाचे रेशीम कोष खरेदी केंद्र, कोष गोडाऊन/ड्रायर (रेशीम कोष वाळविणे) केंद्राचा देखभाल खर्च, कोष हाताळण्याची मजुरी, वीज देयक, कोष खरेदी केंद्राचे जागा भाडे व पाणी खर्च.

३) **अंडीपुंज निर्मिती केंद्र (Grainage Centre) व शितगृहे (Cold Storage):** अंडीपुंज निर्मिती केंद्राचा देखभाल खर्च, मजुरी, वीजबील पाणीबील, किटक संगोपनाचा मजुरी खर्च, किरकोळ साहित्य खरेदी खर्च.

४) **व्टिस्टींग (धाग्याला पीळ देणे) व कापड निर्मिती केंद्र:-** या अंतर्गत देखभाल खर्च, संयंत्राचे सुटे भाग खरेदी व दुरुस्ती, व्टिस्टींग साहित्य खरेदी, वीज देयक व पाणी खर्च व किरकोळ खर्च.

५) **टसर विभागाचा खर्च (FARM, REELING & GRAINAGE)**:- टसर विभागाचे ८ कोष खरेदी केंद्र, ६ रिलिंग केंद्र, १५ फार्म, कोष गोडाऊन/ड्रायर (रेशीम कोष वाळविणे), कोष खरेदी केंद्राचे जागा भाडे व पाणी खर्च, अंडीपुंज निर्मिती केंद्राचा देखभाल खर्च, मजुरी, वीजबील, पाणीबील, किटक संगोपनाचा मजुरी खर्च, किरकोळ साहित्य खरेदी खर्च.

३. वरील योजना राबविण्यासाठी होणारा खर्च हा रेशीम संचालनालयाकडे सन २०१०-११ मध्ये जिल्हास्तरीय योजनेंतर्गत उपलब्ध असलेल्या तरतुदीतून तरतुदीच्या मर्यादेतच भागविण्यात यावा.

चालू आर्थिक वर्षात या शीर्षाखाली अतिरिक्त तरतूद उपलब्ध केली जाणार नाही. तसेच संचालक (रेशीम) यांनी यापुढील आर्थिक वर्षात लागणारी तरतूद प्रत्येक वर्षी विहित मार्गाने अर्थसंकल्पीत करुन घेण्याची दक्षता घ्यावी. सदरचा खर्च करण्यास तसेच त्याच्या अखत्यारितील क्षेत्रिक अधिकाऱ्यांना वितरीत करण्यास "नियंत्रक अधिकारी" म्हणून संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना घोषित करण्यात येत आहे. याबाबत संचालक (रेशीम) यांनी विहित केलेल्या बाबींवरच खर्च करण्यात येईल. त्याव्यतिरिक्त इतर बाबींवर खर्च होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

४. सदरहू शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५११/२०१०/व्यय-२, दिनांक १/०९/२०१० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००९०८१८४६३३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्र. बा. कडवे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रति:-

१ महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/ ऑडीट), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / ऑडीट), नागपूर
३. वरीष्ठ उप महालेखापाल (पडताळणी), बाहय लेखापरिक्षा विभाग (नागरी), मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
६. सर्व जिल्हयांचे जिल्हाधिकारी / जिल्हा कोषागार अधिकारी
७. नियोजन विभाग (का-१४६३), मंत्रालय, मुंबई(दोन प्रती)
८. वित्त विभाग (व्यय-२/ अर्थसंकल्प कार्यासन-३ व १३/ कोषागारे/वित्तीय सुधारणा), मंत्रालय,मुंबई
९. संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, द्वारा महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या, उमरेड रोड, नागपूर-९
१०. उप संचालक, रेशीम संचालनालय, द्वारा महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या, उमरेड रोड, नागपूर-९
११. सहाय्यक संचालक, विभागीय रेशीम उद्योग कार्यालय, बोबडे भवन, राजापेठ, रेल्वे गेट जवळ, तारामाता मंदिरासमोर, अमरावती-४४४६०१.
१२. सहाय्यक संचालक, विभागीय रेशीम उद्योग कार्यालय, २४ ब, मुंबई पुणे मार्ग, पुणे-३
१३. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी १), उपविभागीय रेशीम उद्योग कार्यालय, बजाज बिल्डींग शास्त्री चौक, गोवर्धन मार्ग, वर्धा.
१४. रेशीम विकास अधिकारी, (श्रेणी १), उपविभागीय रेशीम उद्योग कार्यालय, सिडको, एन-१ प्लॉट नंबर १५, एम.आय.डी.सी, टाऊन सेंटर जवळ, नवीन औरंगाबाद
१५. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी १), उपविभागीय रेशीम उद्योग कार्यालय, व्यापारी पेठ, शाहुपूरी, पहिली गल्ली, कोल्हापूर.
१६. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी १), उपविभागीय रेशीम उद्योग कार्यालय, इंदीरा स्टेडीयम, गाळा क्रमांक ५०, सोलापूर.
१७. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी १), जिल्हा रेशीम कार्यालय, आशिष सर्व्हे क्र.३५, प्लॉट नं.११, संध्या कालनी, पहिला मजला, कैलास हॉटेल मागे, स्टेशन रोड, अहमदनगर - ४१४००१
१८. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी १), प्रादेशिक टसर रेशीम कार्यालय, आरमोरी,

जिल्हा-गडचिरोली

१९. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी १), उपविभागीय रेशीम उद्योग कार्यालय, बसमत मार्ग, खानापूर नाक्याजवळ, परभणी -१

२०. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी २), रेशीम उद्योग कार्यालय, भोंडे हॉस्पीटल जवळ, धार रोड, बुलढाणा ४४३ ००१

२१. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी २), जिल्हा रेशीम उद्योग कार्यालय, ७/८, रातकर कॉम्प्लेक्स, अंबर रोड, जालना

२२. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी २), जिल्हा रेशीम कार्यालय, सारस्वत बँक चौक, टिळकवाडी, यवतमाळ.

२३. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी २), जिल्हा रेशीम कार्यालय, लातूर

२४. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी २), जिल्हा रेशीम कार्यालय, लोकल बोर्ड कॉलनी, सांगली- ४१६ ४१६

२५. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी २), रेशीम केंद्र, आंबोली, ता- सावंतवाडी

२६. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी २), जिल्हा रेशीम कार्यालय, यशोधरा बंगला, प्लॉट नं.२०, सर्व्हे नं.४२५/२, जांधे सॉ मिलजवळ, द्वारका सर्कल, नाशिक

२७. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी २), रेशीम संचालनालय, जिल्हा रेशीम कार्यालय, वाई, मु.पो.ता.वाई, जिल्हा-सातारा

२८. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी २), जिल्हा रेशीम कार्यालय, "मगनकुंज", मगनपूरा, बालाजी मंदीरा समोर, नवामोंढा, नांदेड

२९. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी २),जिल्हा रेशीम कार्यालय, जिल्हा-वाशिम

३०. रेशीम विकास अधिकारी (श्रेणी २), जिल्हा रेशीम कार्यालय, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ, उमरेड रोड, नागपूर-९.

३१. रेशीम विकास अधिकारी श्रेणी-२, अंडीपुंज निर्मिती केंद्र, सुळेरान, पो.गवसे, ता.आजरा, जि.कोल्हापूर

३२. रेशीम विकास अधिकारी श्रेणी-२, जिल्हा रेशीम कार्यालय,उस्मानाबाद

३३. रेशीम विकास अधिकारी श्रेणी-२, जिल्हा रेशीम कार्यालय,भंडारा

३४. रेशीम विकास अधिकारी श्रेणी-२, जिल्हा रेशीम कार्यालय, दहिफळे बिल्डींग, हॉटेल यशोदीप समोर, बार्शी रोड, शिवाजी नगर (पूर्व), बीड-४३११२२.

३५. रेशीम विकास अधिकारी, श्रेणी-२, जिल्हा रेशीम कार्यालय, एम.आय.डी.सी. फेज नं.१, प्लॉट नं.८,९,१० शिवर, अकोला.

३६. रेशीम विकास अधिकारी, श्रेणी-१, जिल्हा रेशीम कार्यालय, मुंबई-पुणे रस्ता, पुणे-३.

३७. निवड नस्ती.